**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्यास रू. ७५००.०० लक्ष रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. मुअप्र-२०२४/प्र.क्र. ७८/९-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ०३ जून, २०२४

वाचा-

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.राअअ-१११६/प्र.क्र. २४८/१४अे, दि. २० जून, २०१७
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.कृप्रधो-२०१७/प्र.क्र. २०८/९अे, दि. ३१ ऑक्टोबर, २०१७
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.कृराधो-१४१७/प्र.क्र. १०९/९अे, दि. ०६ जून, २०१८
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मुअयो-२०२२/प्र.क्र. ६४/९अे, दि. १७ मे, २०२२
५. वित्त विभाग, शासन परिपत्र क क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४
६. कृषि संचालक (कृषि प्रकिया व नियोजन), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. /मुकृवअप्रयो/ ११३०४/२०२४, दि. १०.०४.२०२४
७. कृषि संचालक (कृषि प्रकिया व नियोजन), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. /मुकृवअप्रयो/ ११८३४/२०२४, दि. २३.०४.२०२४

प्रस्तावना :-

राज्यातील अन्नप्रक्रिया उद्योगाला चालना देणे, शेतीमालाचे मूल्यवर्धन करणे करिता शेतकऱ्यांचे सहभागाद्वारे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्प स्थापित करण्यास प्रोत्साहन देणे, उत्पादित अन्न पदार्थाच्या गुणवत्तेमध्ये वाढ व्हावी, उर्जेची बचत व्हावी यासाठीच्या प्रकल्पाच्या आधुनिकीकरणास प्रोत्साहन देणे या उद्दिष्टांसह उपरोक्त वाचा येथील **क्रमांक १** च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षासाठी **मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना** ही १००% राज्य पुरस्कृत योजना सुरु करण्यात आली आहे. तसेच **क्रमांक २** येथील शासन निर्णयान्वये राज्याचे अन्न प्रक्रिया धोरण-२०१७ जाहीर करण्यात आले असून **क्रमांक ३** येथील दि. ६.६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यमध्ये अन्न प्रक्रिया योजनेअंतर्गत लघु, सुक्ष्म व मध्यम उद्योगांसाठी क्षेत्र मर्यादा विहीत करण्यात आली आहे. तसेच वाचा येथील **क्रमांक ४** च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सदर योजना २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून पुढील ५ वर्षाकरिता म्हणजेच सन २०२६-२०२७ या आर्थिक वर्षाअखेरपर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे.

त्यानुषंगाने, मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२४-२५ मध्ये राज्यात राबविण्याकरिता रू. ७५००.०० लक्ष (रूपये पंचाहत्तर कोटी फक्त) एवढया रकमेची तरतूद

अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सदर योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२४-२५ मध्ये राज्यात राबविण्याकरिता रू.७५००.०० लक्ष (रूपये पंचाहत्तर कोटी फक्त) एवढया रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** संदर्भांकित शासन निर्णय दि. २०/०६/२०१७ अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

**३.** सदर योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पीत निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

मागणी क्र. डी-३,
२४०१-पीक संवर्धन,
(००)(१०२) अन्नधान्य पीके,
(००)(३४) मुख्यमंत्री कृषी व अन्न प्रक्रिया योजना (१००% राज्य योजना)
(२४०१ A ७९१)
३३, अर्थसहाय्य

**५.** राज्य शासनाने विहीत केलेले नियम/सुचनांचे पालन करून लेखापरिक्षण करून निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०६०३१५३५०७५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षंकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

HEMANT GORAKHNATH
MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5,
cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.06.03 15:48:26 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३२.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
६) मा. विरोधीपक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
७) मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवाल, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११) प्रधान सचिव (कृषि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१३) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१५) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१६) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण)-१/२, मुंबई/नागपूर.
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
२०) सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२२) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
२३) कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२४) कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२५) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२६) निवड नस्ती-९अे.